'शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधी' पत्रकारांना आर्थिक मदत करण्याबाबत

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांक-माजम-२०११/प्र.क्र.३८२/३४
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १७ ऑक्टोबर २०११.

वाचा : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्र.माजम-२००९/५७३/ प्र.क्र.१०४/३४, दि.१.८.२००९
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्र-माजम-२००९/५७३/ प्र.क्र.१०४/३४, दि.१९.३.२०१०
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग,क्र-माजम-२००९/५७३/ प्र.क्र.१०४/३४, दि.१.६.२०१०

**प्रस्तावना :-**

पत्रकारांना दुर्धर आजार, अपघात झाल्यास किंवा आकस्मिक मृत्यू झाल्यास त्यांना किंवा त्यांच्या कुटुंबियांस मदत करण्याच्या उद्देशाने 'शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधी'ची स्थापना करण्यास संदर्भाधीन दि.१.८.२००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे. सदर निधीच्या व्यवस्थापनासाठी संदर्भाधीन अ.क्र.२ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन दि.१.६.२०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये ४ शासकीय सदस्य, ७ अशासकीय सदस्य, २ निमंत्रित शासकीय सदस्य व ८ निमंत्रित अशासकीय सदस्य मिळून २१ सदस्यांचे कार्यकारी मंडळ शासनाने नियुक्त केलेले आहे.

तातडीची मदत मिळण्यासाठी एखाद्या अर्जदाराचा अर्ज प्राप्त झाल्यास महासंचालक, माहिती व जनसंपर्क यांच्या अध्यक्षतेखालील उपसमितीस प्राधिकृत करणे, पत्रकारांना या निधीतून आर्थिक मदत देण्यासाठी पात्रतेचे निकष, अर्जाचा नमुना, मदतीची प्रकरणपरत्वे रक्कम व कार्यपद्धती विहित करणे, तसेच सदर विश्वस्त संस्थेच्या कार्यकारी मंडळावर संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क) यांची नियुक्ती करुन त्यांची सदस्य सचिव

म्हणून नियुक्ती करणे या बाबी शासनाच्या विचाराधीन होत्या. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतले आहेत.

**<u>शासन निर्णय :</u>**

शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधी या विश्वस्त संस्थेवर संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क) यांची सदस्य म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. तसेच महासंचालक, माहिती व जनसंपर्क यांच्याऐवजी संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क) यांची सदर विश्वस्त संस्थेचे सदस्य सचिव म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. 'शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधी' या विश्वस्त संस्थेची तीन महिन्यातून एकदा बैठक बोलावून त्या बैठकीत उपलब्ध तरतूदीनुसार आर्थिक मदतीची प्रकरणे विचारात घेतली जावीत. या विश्वस्त संस्थेची कार्यपद्धती खालीलप्रमाणे राहील,

२. **<u>आर्थिक मदत मिळण्यासाठी पात्रतेचा निकष</u>**

'अधिस्वीकृतीधारक पत्रकार' हा संवर्ग 'शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधी' मधून विहित पद्धतीने आर्थिक मदत मिळण्यासाठी पात्र राहील.

३. **<u>तातडीची मदत मिळण्यासाठी</u>**

तातडीची आर्थिक मदत मिळण्यासाठी एखाद्या अर्जदाराचा अर्ज विश्वस्त मंडळाच्या बैठकीनंतर प्राप्त झाल्यास 'शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधी' या विश्वस्त संस्थेची बैठक न बोलाविता संबंधित अर्जदाराला मदत देण्याबाबत महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांच्या अध्यक्षतेखालील उपसमिती निर्णय घेईल. तद्नंतर सदर प्रस्तावास विश्वस्त मंडळाच्या पुढील बैठकीत कार्योत्तर मंजूरी घेतली जाईल

४. **<u>आर्थिक मदतीची रक्कम व अर्जाचा नमुना</u>**

(अ) आर्थिक मदतीची अनुज्ञेय रक्कम व आजारांची यादी या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट अ-मध्ये नमूद केली आहे. त्याप्रमाणे अधिस्वीकृती धारक पत्रकारास विहित पद्धतीने आर्थिक मदत अनुज्ञेय राहील.

(ब) अधिस्वीकृती धारक पत्रकाराचे निधन झाल्यास त्याच्या कुटुंबियांना विहित पद्धतीने आर्थिक मदत अनुज्ञेय राहील.

निधीतून आर्थिक मदत मिळण्यासाठी अर्जाचा विहित नमुना सोबतच्या परिशिष्ट ब-येथे जोडण्यात आला आहे.

५. निधीतून आर्थिक मदत करण्यासाठीची कार्यपद्धती

'शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधी'मधून मदत मिळण्यासाठी मुंबई/मुंबई उपनगर जिल्ह्यातील अर्जदाराने उपसंचालक (वृत्त), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ यांच्याकडे व उर्वरित जिल्ह्यातील अर्जदाराने संबंधित जिल्हा माहिती अधिकारी यांच्याकडे अर्ज आवश्यक कागदपत्रांच्या साक्षांकित प्रतीसह करण्यात यावा. अशा अर्जांची नियमानुसार छाननी करुन परिपूर्ण प्रकरण उपसंचालक (वृत्त)/जिल्हा माहिती अधिकारी (यथास्थिती) यांनी या विश्वस्त संस्थेच्या सदस्य सचिवांकडे सादर करावेत.

६. सादर करण्यात येणाऱ्या प्रकरणासोबत उपसंचालक (वृत्त)/संबंधित जिल्हा माहिती अधिकारी यांनी 'मी प्रत्यक्ष संबंधित रुग्णाची भेट घेतली असून त्याने रुग्णालयात घेतलेल्या उपचारांची संबंधित कागदपत्रांवरुन खातरजमा केली असून ती सत्य असल्याबद्दल प्रमाणित करीत आहे', असे प्रमाणपत्र सादर करावे. तसेच संबंधित वैद्यकीय अधिकारी/नोंदणीकृत खासगी वैद्यकीय व्यवसायीक यांच्याकडून आवश्यक प्रमाणपत्र घेऊन तेही प्रकरणासोबत सादर करावे.

७. वरीलप्रमाणे प्राप्त होणारे सर्व अर्ज विश्वस्त संस्थेच्या बैठकीत प्रथम मान्यतेसाठी सादर करण्यात यावेत. तद्नंतर मान्य झालेले अर्ज प्रथम येणाऱ्यास प्राधान्य (First come first serve) या तत्त्वावर नियमातील तरतूदीनुसार अनुज्ञेय व मंजुर प्रकरणी विचारात घेण्यात यावे. मंजूर झालेली रक्कम शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधीच्या रकमेवर बँकेमार्फत प्राप्त झालेल्या व्याजाच्या रकमेतून संबंधित अर्जदारास प्रदान करण्यात यावी.

८. हा शासन निर्णय प्रलंबित प्रकरणांनादेखील लागू करण्यात यावा. मात्र, यापूर्वीची निर्णयीत ठरलेली प्रकरणे पुन्हा सुरु करण्यात येऊ नये.

९. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०११११०१७१३०९३१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(आ.म. लुडबे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

मुख्यमंत्र्यांचे सचिव/उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खासगी सचिव
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा) मुंबई/नागपूर
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
संचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
संचालक (माहिती), नागपूर-अमरावती, नागपूर
संचालक (माहिती), मराठवाडा विभाग, औरंगाबाद
उपसंचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, नवी दिल्ली
उपसंचालक (माहिती), नाशिक, पुणे, अमरावती, कोकण, कोल्हापूर, लातूर विभाग
उपसंचालक (वृत्त), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
सर्व जिल्हा माहिती अधिकारी
वरिष्ठ सहायक संचालक (माहिती), महाराष्ट्र परिचय केंद्र, पणजी-गोवा
सर्व उप माहिती केंद्रे/कार्यालये
निवड नस्ती.

## परिशिष्ट 'अ'

| अ.क्र. | गंभीर आजार | मदतीची रक्कम |
|---|---|---|
| १ | हृदय शस्त्रक्रियांची प्रकरणे (Heart surgery) | रु.५०,०००/- |
| २ | हृदय उपमार्ग शस्त्रक्रिया (Bye Pass surgery) | रु.५०,०००/- |
| ३ | ॲन्जोप्लास्टी शस्त्रक्रिया | रु.५०,०००/- |
| ४ | मुत्रपिंड प्रतिरोपण शस्त्रक्रिया (Kidney Transplantation) | रु.५०,०००/- |
| ५ | रक्ताचा/इतर कर्करोग (Blood/Other type Cancer) | रु.५०,०००/- |

| अ.क्र. | वरील प्रकरणे वगळता इतर प्रकरणे | मदतीची रक्कम |
|---|---|---|
| ६ | कायम अपंगत्व आल्यास व त्यामुळे उपजीविका करण्यास असमर्थ असलेल्या प्रकरणी पत्रकारास | रु.५०,०००/- |
| ७ | अपघातामुळे एक हात किंवा एक पाय गमवावा लागलेल्या पत्रकाराच्या बाबतीत | रु.५०,०००/- |
| ८ | पत्रकाराचे आकस्मिक वा अपघाती निधन झाल्यास त्यांच्या कुटुंबियास | रु.५०,०००/- |
| ९ | क्षयरोग | रु.५०,०००/- |
| १० | ४०% अपंगत्व (शारिरीक, अंधत्व, कर्णबधीर इ.) | रु.२०,०००/- |
| ११ | मोतीबिंदू शस्त्रक्रिया | रु.१५,०००/- |

| अ.क्र. | आकस्मिक आजार | मदतीची रक्कम |
|---|---|---|
| १२ | हृदयविकाराचा झटका (Cardiac emergency)<br>प्रमस्तिक संहनी (Carabral vascular)<br>फुफ्फुसाच्या विकाराचा झटका (Pulmonary emergency)<br>ॲन्जिओग्राफी चाचणी | रु.१५,०००/- |
| १३ | अतिरक्तदाब (Hypertension) | रु.१५,०००/- |
| १४ | धनुर्वात (Titanus) | रु.१५,०००/- |
| १५ | घटसर्प (Diphtheria) | रु.१५,०००/- |
| १६ | अपघात (Accident) आघात संलक्षण (Shock Syndrome) हृदयाशी आणि रक्तवाहिनीशी संबंधित (Cardiological and Vascular) | रु.१५,०००/- |
| १७ | गर्भपात (Abortions) | रु.१५,०००/- |
| १८ | तीव्र उदर वेदना/आंत्र अवरोध (Acute abdominal pains/Intestinal obstruction) | रु.१५,०००/- |
| १९ | जोरदार रक्तस्त्राव (severe haemriage) | रु.१५,०००/- |

| अ.क्र. | आकस्मिक आजार | मदतीची रक्कम |
|---|---|---|
| २० | गॅस्ट्रो -एन्ट्रायटिस (Gastro-Entrietis) | रु.१५,०००/- |
| २१ | विषमज्वर (Typhoid) | रु.१५,०००/- |
| २२ | निश्चेतनावस्था (Coma) | रु.१५,०००/- |
| २३ | मनोविकृतीची सुरुवात (Onset of Psychiatric disorder ) | रु.१५,०००/- |
| २४ | डोळ्यातील दृष्टीपटल सरकणे (Retinal detachment in the eye) | रु.१५,०००/- |
| २५ | स्त्री रोग शास्त्र आणि प्रसुती शास्त्र संबंधी यांच्याशी आकस्मिक आजार (Gynecological and Obstetric emergency) | रु.१५,०००/- |
| २६ | जननमुत्र आकस्मिक आजार (Genito Urinary Emergency) | रु.१५,०००/- |
| २७ | वायुकोष (Gas Gangrine) | रु.१५,०००/- |
| २८ | कान, नाक किंवा घसा यामध्ये विजातीय पदार्थ गेल्यामुळे निर्माण झालेले आकस्मिक आजार (Foreign body in ear, nose or throat emergency) | रु.१५,०००/- |
| २९ | ज्यामध्ये तातडीने शस्त्रक्रिया करणे आवश्यक असते अशा जन्मजात असंगती (Cogenital anamolies requiring urgent surgical intervention) | रु.१५,०००/- |
| ३० | ब्रेन ट्यूमर (Brain Tumor) | रु.१५,०००/- |
| ३१ | भाजणे (Burns) | रु.१५,०००/- |
| ३२ | इपिलेप्सी (Epilepsy) | रु.१५,०००/- |
| ३३ | ॲक्युट ग्लायकोमा (Acute glaucoma) | रु.१५,०००/- |
| ३४ | मज्जारज्जू स्पायनस स्कॉड संबंधात आकस्मिक आजार | रु.१५,०००/- |
| ३५ | उष्माघात | रु.१५,०००/- |
| ३६ | रक्तासंबंधी आजार | रु.१५,०००/- |
| ३७ | प्राणी चावल्यामुळे होणारी विषबाधा | रु.१५,०००/- |
| ३८ | रसायनामुळे होणारी विषबाधा | रु.१५,०००/- |

——— x ———

## परिशिष्ट 'ब'

## शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधीतून मदत मिळण्यासाठी करावयाचा अर्ज

प्रति,

सदस्य सचिव तथा संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क)
शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधी,
माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२

**विषय : शंकरराव चव्हाण सुवर्ण महोत्सवी पत्रकार कल्याण निधीतून आर्थिक मदत मिळणेबाबत.**
**(संबंधित जिल्हा माहिती अधिकारी यांच्या कार्यालयामार्फत अर्ज सादर करणे)**

महोदय,

उपरोक्त विषयान्वये मी विनंती अर्ज करतो/करते की, मला माझ्या आजारपणासाठी/माझ्या कुटुंबियाच्या आजारपणासाठी/अपघाती मृत्यू प्रकरणी आर्थिक मदतीची गरज असून त्याबाबतची सविस्तर माहिती मी खालीलप्रमाणे भरुन देत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | अर्जदाराचे संपूर्ण नाव :<br>(आडनाव, स्वत:चे नाव, वडिलांचे नाव) | |
| २ | पदनाम (हुद्दा) : | |
| ३ | वृत्तपत्र/वृत्तसंस्थेचे नाव : | |
| ४ | वृत्तपत्र/वृत्तसंस्थेच्या कार्यालयाचा पत्ता :<br><br>दूरध्वनी क्रमांक : | |
| ५ | अर्जदाराचा निवासी पत्ता :<br><br>दूरध्वनी क्रमांक : | भ्रमणध्वनी क्रमांक : |
| ६ | जन्मतारीख : | वय : |
| ७ | अधिस्वीकृती पत्रिकेची छायाप्रत जोडली आहे/नाही | |

| | |
|---|---|
| ८ | आजाराचे स्वरुप - (सविस्तर द्यावे)<br>दुर्धर आजार / अपघात / अपघाती मृत्यू / आकस्मिक मृत्यू /अपंगत्व |
| ९ | वैद्यकीय उपचार घेतले असल्यास/घेत असल्यास त्या संस्थेचे नाव व पत्ता :<br>(कागदपत्रे जोडावीत) |

अर्ज मृतांच्या नातेवाईकांना मदतीसाठी असेल तर :

| | |
|---|---|
| १० | मयत झालेल्या व्यक्तीचे नाव :<br>सोबत - मृत्यू दाखला |
| ११ | पात्र वारसदार नाव/नावे : |
| १२ | आर्थिक मदतीची मागणी रक्कम : |

वरीलप्रमाणे अर्जाचा सहानुभूतीपुर्वक विचार करुन आर्थिक मदत मिळावी, ही विनंती.

दिनांक :　　　　　　　　　　अर्जदाराची सही/वारसाची सही

स्थळ :　　　　　　　　　　(नाव) :

सोबत :

१) जिल्हा माहिती अधिकारी यांचे प्रमाणपत्र
२) जिल्हा आरोग्य अधिकारी/जिल्हा शल्य चिकित्सक यांचा दाखला
३) पोलीस पंचनामा कागदपत्रे (लागू असलेल्या प्रकरणी)
४) अपंगत्वाच्या प्रमाणाबाबतचे प्रमाणपत्र
५) अधिस्वीकृती पत्रिकेची छायाप्रत

## जिल्हा माहिती अधिकारी यांची शिफारस

प्रमाणित करण्यात येते की, श्री./श्रीमती------------------------------------------- हे------------------------ या वृत्तसंस्थेत कार्यरत आहेत/होते. त्यांना मी ओळखतो. त्यांना ----------------------- हा गंभीर आजार होता/आहे. त्यांचे अपघाती निधन झाले. त्यांना ------ % अपंगत्व असून त्यांनी/त्यांच्या कुटुंबियांनी अर्जात भरलेली माहिती बरोबर असल्याची मी खात्री केली आहे. त्यांना आर्थिक मदतीची गरज असून त्यांना नियमानुसार मदत करण्यात यावी.

मी प्रत्यक्ष संबंधित रुग्णाची भेट घेतली असून त्याने रुग्णालयात घेतलेल्या उपचारांची संबंधित कागदपत्रांवरुन खातरजमा केली असून ती सत्य असल्याबद्दल प्रमाणित करीत आहे.

स्थळ :

जिल्हा माहिती अधिकारी
सही व शिक्का

दिनांक :